अजंठा-वेरुळ लेण्यांचे संरक्षण परिरक्षण व परिसर विकास प्रकल्पाच्या दुस-या टप्प्याच्या कामास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक एमटीसी २००२/३/प्र.क्र.१४०/पर्यटन,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १० मे २००२.

**पहा:-** शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक एमटीसी १०९१/प्र.क्र.४७६/पर्यटन, दिनांक २८ नोव्हेंबर १९९१.

**प्रस्तावना:-** युनेस्कोने मान्यता दिलेल्या जागतिक वारसा जपणा-या भारतातील १७ सौंदर्य स्थळांमध्ये अजंठा-वेरुळ येथील लेण्यांचा समावेश होतो. योग्य सुविधा व प्रसिध्दीच्या अभावामुळे या लेण्यांना पर्यटक कमी प्रमाणात भेट देतात. शिवाय औरंगाबाद येथे अद्यावत विमानतळ नाही. तेथे जाण्यासाठी किंवा तेथून निघण्यासाठी विमानोड्डाणांची संख्या ही अतिशय कमी आहे. वीज, पाणीपुरवठा व निच-याची व्यवस्था, माहिती केंद्रे, दृकश्राव्य साधने, आराम बसगाडया, व टॅक्सी आदि साधनसामुग्रीसहीत अजंठा आणि वेरुळकडे जाणा-या रस्त्यांची सुधारणा होणे ही आवश्यक आहे. हया लेण्यांची जपणूक करुन त्याचबरोबर सभोवतालच्या परिसराची सुधारणा करण्याच्या दृष्टीने अजंठा-वेरुळ विकास प्रकल्प तयार करण्यात येवून त्याच्या पहिल्या टप्प्याच्या कामास उपरोक्त शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. सदर प्रकल्प केंद्र शासन व जपान सरकार यांच्यामध्ये झालेल्या करारानुसार पूर्ण करावयाचा आहे. सदर करारानुसार हया प्रकल्पाचा विकास आराखडा हा दोन टप्प्यामध्ये निश्चित करण्यात आला. पैकी टप्पा-१ चे काम १९९२ मध्ये सुरु होवून नियोजित कामे १९९८ मध्ये पूर्ण झाली. तथापी या टप्प्यातील वाढीव कामे मार्च २००२ अखेर पूर्ण झाली आहेत. टप्पा-१ मध्ये प्रमुख रस्ते, पाणीपुरवठा व विद्युत पुरवठा या पायाभूत सुविधा पुरविणे तसेच विमानतळ विस्तार यास प्राधान्य देण्यात आलेले आहे. या टप्प्याचा अपेक्षित अंदाजित खर्च रु. ११० कोटी होता.

२. जपान बँक फॉर इंटरनॅशनल को-ऑपरेशन यांच्या अर्थसहाय्याने दोन्ही टप्पे कार्यान्वित करावयाचे असून या टप्प्यातील खर्चापैकी १८ टक्के खर्च राज्य शासनाने करावयाचा असून ८२ टक्के खर्च हा प्रतिपूर्तीने जे. बी. आय. सी. तर्फे भागविण्यात येत आहे.

३. औरंगाबाद येथे दिनांक ९ व १० एप्रिल २००२ रोजी झालेल्या मंत्रिमंडळाच्या बैठकीत टप्पा-२ च्या कामास तत्वत: मान्यता देण्यात आली असून त्याकरिता

एकूण अपेक्षित अंदाजित खर्च रुपये ५२२.७ कोटी यासही मान्यता देण्यात आलेली आहे. टप्पा-२ च्या कामास या आर्थिक वर्षापासून म्हणजे एप्रिल २००२ पासून सुरुवात करण्याचे अपेक्षित आहे. सदर प्रकल्पाचा कालावधी साधारणतः पाच वर्षांचा राहील. मंत्रिमंडळाने घेतलेल्या सदर निर्णयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**निर्णयः-**

१) उपरोक्त अजंठा-वेरुळ विकास प्रकल्पाच्या रुपये ५२२.७ कोटी इतक्या अंदाजित खर्चास केंद्र शासनाच्या संबंधित विभागांच्या औपचारिक मंजूरीच्या अधीन राहून राज्य शासनाची तत्वतः प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) प्राचीन शिल्पांचे जतन, विमानतळाची सुधारणा, वनीकरण, रस्त्यांची सुधारणा, पाणीपुरवठा योजना, अजंठा-वेरुळ येथील निर्वाचन केंद्रासह पर्यटक संकुल व लेण्याची प्रतिकृती इत्यादी बाबींचा टप्पा-१ मध्ये समावेश होता. **आता प्रसिध्दी व प्रचलन स्थळांचा विकास दर्शक फलक लावणे इतर वास्तुशिल्पाचे जतन आणि नाशिक, मुंबई, एलिफंटा व औरंगाबाद येथील विभागातील पर्यटन प्रकल्प, बौध्द लेण्यांच्या सानिध्यात ठिकठिकाणी छोटया स्तरावर पतपुरवठा व्यवस्था, "टी" जंक्शन ते अजंठा पायथा या अंतरामध्ये प्रदुषणरहित इलेक्ट्रोवन बसेस सुरु करणे या बाबी अतिरिक्त बाबी म्हणून टप्पा-२ मध्ये टप्पा १ मधील उर्वरीत कामांसह समाविष्ट करण्यात आल्या आहेत.**

३) सदर प्रकल्पाअंतर्गत येणा-या विविध कामांची विगतवारी त्यासाठी अंदाजित खर्च व सदर काम कार्यान्वित करणा-या विभागाचे/संस्थेचे नाव खालील तक्त्यात दर्शविण्यात आले आहे.

| कामाचे स्वरुप<br>१ | अंदाजे खर्च (कोटीमध्ये)<br>२ | प्रत्यक्ष कार्यवाही करणारे विभाग /संस्था<br>३ |
|---|---|---|
| १) प्राचीन शिल्पाचे जतन | ४६.१ | भारतीय पुरातत्व सर्वेक्षण संस्था |
| २) विमानतळाची सुधारणा | ५६.८ | भारतीय विमान प्राधिकरण संस्था |
| ३) वनीकरण | १२.८ | महसूल व वन विभाग |
| ४) रस्त्याची सुधारणा | १६५.७ | सार्वजनिक बांधकाम विभाग |
| ५) पाणीपुरवठा योजना | ६.५ | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग / महाराष्ट्र जीवन प्राधिकरण |
| ६) अजंठा-एलोरा येथील निर्वचण केंद्रासह पर्यटक संकुल व लेण्यांच्या प्रतिकृति तयार करणे | ६०.९ | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ |
| ७) प्रसिध्दी व प्रचलन | ६६.८ | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ |
| ८) स्थळांचा विकास/दर्शक फलक | १०६.०० | म.प.वि.म. ग्रामीण बँकेद्वारे सुक्ष्म |

| | | |
|---|---|---|
| इतर वास्तुशिल्पाचे जतन आणि नाशिक, मुंबई, एलिफंट्या व औरंगाबाद येथील विभागातील पर्यटन प्रकल्प, बौध्द लेण्याच्या सानिध्यात ठिकठिकाणी छोटया स्तरावर पतपुरवठा व्यवस्था. | | वित्तिय व्यवस्था |
| सल्लागारांची फी | १.१७ | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ |
| एकूण प्रकल्प निधी | ५२२.७ | रुपये कोटीत. |

४) टप्पा दोन करिता लागणा-या निधीची तरतूद तसेच सदरहू प्रकल्प पाच वर्षानंतर पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पातील पूर्ण केलेली कामे सुस्थितीत ठेवण्यासाठी दरवर्षी लागणारी तरतूद ही त्या संबंधित विभागामार्फत करण्यात येईल.

५) अजंठा-वेरुळ लेणी संवर्धन व परिसर विकास टप्पा क्रमांक-२ यास महाराष्ट्र शासनाने तत्वतः मान्यता दिली असून तसे केंद्र शासनास कळविण्यास मान्यता दिली आहे.

६) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातर्फे जी पाणीपुरवठा योजना पूर्ण करण्यात आली आहे, त्याचे हस्तांतरण वर उल्लेखलेल्या ग्राम विकास विभागाच्या दिनांक २८.११.१९९१ च्या शासन निर्णयानुसार तातडीने जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्याकडे सुपूर्द करणे व ती योजना जिल्हा परिषद, औरंगाबाद यांच्यामार्फत राबविण्यास व याबाबतचा खर्च जिल्हा परिषदेने पाणीपट्टीद्वारे भागविण्यास मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे, त्याप्रमाणे तातडीने कार्यवाही संबंधित विभागाने करावी.

७) टप्पा क्रमांक-२ यास जे.बी.आय.सी. (जपान) या संस्थेकडून अर्थसहाय्य मिळण्यास तत्वतः मान्यता देण्यात आली आहे त्यास अनुसरुन अर्थसहाय्य प्राप्त झाल्यानंतर टप्पा क्रमांक-२ च्या ज्या योजना केंद्र शासन व राज्य शासनाच्या विभागामार्फत कार्यान्वित होणार आहेत त्या त्या विभागाने त्यांच्या अंतर्गत पार पाडावयाच्या कामाकरिता तसेच दोन्ही टप्प्याच्या देखभालीकरिता व सुविधा पुरविण्याकरिता करावयाच्या खर्चाची अर्थसंकल्पीय तरतूद करुन घ्यावी. तसेच त्याच्या प्रतिपूर्तीस देखील टप्पा क्रमांक-१ मध्ये विहित केल्यानुसार म्हणजेच ८२ टक्के प्रतिपूर्ती यास मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेप्रमाणे संबंधित विभागांनी कार्यवाही करावी.

८) "टी" जंक्शन ते अजंठा-वेरुळ पायथ्यापर्यन्तचा भाग लेण्यांच्या संवर्धनाच्या दृष्टीने तसेच एकूण परिसर प्रदुषणमुक्त रहावा या दृष्टीकोनातून प्रदुषणविरहीत बसेस चालविणे व त्या भागात इतर वाहनांना याच कारणास्तव मज्जाव करणे यास मंत्रीमंडळाची तत्वतः मान्यता मिळाली. त्यानुसार ही बस सेवा महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने कार्यान्वित करावी.

९) या टप्प्याचे पुनर्विलोकन करण्यास्तव मुख्यसचिवांच्या अध्यक्षतेखाली पुनर्विलोकन समिती स्थापन करण्यात यावी. त्यामधील सभासद मुख्य सचिवांच्या सल्ल्यानंतर निश्चित करण्यात यावेत.

१०) अजंठा-वेरुळ परिसरातील कामाचे टप्पे पूर्ण झाल्यानंतर योजनेअंतर्गत सुरु झालेली कामांची देखभाल व त्या योजना राबविणे याची जबाबदारी स्थानिक पातळीवर/स्थानिक लोक स्वराज्य संस्था यांजकडे निश्चित करण्याकरिता विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांच्या अध्यक्षतेखाली त्यांच्या सल्ल्याने एक समिती गठीत करण्यात येईल. सदर समिती याबाबतीत अंतिम निर्णय घेईल.

११) प्रकल्प क्षेत्रात पर्यटनाच्या विकासासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ यांना महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियमान्वये योग्य प्राधिकरण (Appropriate Authority) म्हणून तसेच या प्रकल्पाचे अंमलबजावणी अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( म. य. पेडणेकर )
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सचिव, भारत सरकार, पर्यटन मंत्रालय, नवी दिल्ली (पत्राव्दारे)
सचिव, भारतीय पुरातत्व विभाग,भारत सरकार, नवी दिल्ली (पत्राव्दारे)
सचिव, भारतीय विमानतळ, प्राधिकरण, भारत सरकार, नवी दिल्ली(पत्राव्दारे)
महासंचालक, भारतीय पुरातत्व सर्वेक्षण विभाग, ---(पत्राव्दारे)
महासंचालक, भारतीय विमानतळ प्राधिकरण, ---(पत्राव्दारे)
मा.राज्यमंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव,
महसूल व वन विभाग, (महसूल), मंत्रालय, मुंबई,
महसूल व वन विभाग (वने), मंत्रालय, मुंबई,
गृह विभाग, (परिवहन), मंत्रालय, मुंबई,
सामान्य प्रशासन विभाग, (नागरी विमान चालन), मंत्रालय, मुंबई,

सार्वजनिक बांधकाम विभाग, (रस्ते), मंत्रालय, मुंबई,
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई,
उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
पर्यावरणविभाग,मंत्रालय, मुंबई,
पाटबंधारे विभाग,मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, ,मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग,मंत्रालय, मुंबई
अन्य सर्व प्रशासकीय विभाग,मंत्रालय, मुंबई यांना माहितीसाठी
महालेखापाल-१, मुंबई( लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता),
महालेखापाल-२ ( नागपूर (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता),
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
विभागीय आयुक्त,औरंगाबाद,
मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद,
मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, मुंबई,
उप संचालक, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
मुख्य वनसंरक्षक, औरंगाबाद,
वन संरक्षक ,औरंगाबाद,
जिल्हाधिकारी, औरंगाबाद,
सदस्य सचिव, महाराष्ट्र पाणीपुरवठा व जलनिस्सारण मंडळ, मुंबई,
महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, मार्ग परिवहन, महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ,मुंबई,
महाव्यवस्थापक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई,
कार्यासन -पर्यटन (निवडधारिकेसाठी)